|| पुस्तक सातवे ||

# || खांदेरी उंदेरी जलदुर्ग ||

**प्रथमावृत्ती : २४ जुलै २०१२**

**लेखन व फ़ोटो : माधुरी नाईक, अरविंद नाईक**

**ऋणनिर्देश:**

मुखपृष्ठ फ़ोटो : उमेश ननावरे

नकाशा: www.trekshitiz .com

संदर्भ: साद सह्याद्रीची ! भटकंती किल्ल्याची !! लेखक - प्र. के. घाणेकर



ई साहित्य प्रतिष्ठान

जी ११०२, ईटर्निटी

मॅरेथॉन चौक

ठाणे . ४००६०४

मांडणी व सजावट: सुनिल सामंत

भविष्यकाळातील

सागरी युद्धतयारीची

गरज ओळखून

त्याप्रमाणे पावले टाकणा-या

छत्रपती शिवाजी महाराजांच्या

दूरदृष्टीला

ही पुस्तिका समर्पित



## ** आडवाटांचे देणे

नमस्कार दोस्तहो!!

रोजच्या धावपळीच्या आयुष्यातून निवांतपणा शोधत डोंगरदऱ्या पालथ्या घालायला सुरुवात करून तुम्हाला अनेक वर्षं झाली असतील. अस्सल ट्रेकरची वर्णने वाचून त्यानुसार स्वत:ला त्यात बसवण्याचा प्रयत्नही करून झाला असेल. मनात आलं की पाठीवर (कायम भरून तयार असलेली) सॅक टाकून भटकणं आता सवयीचं झालं असेल. सगळं जग क्रिकेट मॅच किंवा लग्नसमारंभ अशा मोहमयी गोष्टींत अडकले होते, किंवा थिएटरमधल्या उबदार खुर्च्यांवर बसून थंडगार वातावरणात, अगदी जवळ बसून (कुणाच्या हा प्रश्न तुम्हाला पडला नसणार याची आम्हाला खात्री आहे) वेळ घालवत होते, तेव्हा आपण स्वत: मात्र काय केलं होतं ते आठवतंय ना?

उजाडण्याची वाट बघत रेल्वे प्लॅटफ़ॉर्मवर रात्र काढली होती, वाटेतल्या एखाद्या दगडावरच पाठ टेकवली होतो, सूर्योदय-सूर्यास्ताचे फोटो घ्यायला छाती फुटेपर्यंत कड्याच्या दिशेने धावला होतो, बाहेर पडणाऱ्या पावसाच्या आणि रातकिड्यांच्या किरकिऱ्या म्युझिकच्या साथीने गुहेत ट्रेकी गाण्यांची मैफल भरवली होती. अंधारात, पाऊस तोंडावर झेलत राजांचे मावळे असल्यागत नदी-नाले-

चिखलगाळ तुडवला होता (आणि मुक्कामाला पोहोचलो तेव्हा पायातून बूट शेवटी ओढून काढावे लागले होते!)."घरी आराम करायचं सोडून इथे मरायला यायला कुणी सांगितलं होतं" हा प्रश्न जेव्हा जेव्हा पडला होता तेव्हा पुढच्याच वळणावर एखाद्या झऱ्याने, एखाद्या बुलबुल-ससाण्याच्या शर्यतीने, एखाद्या नाजूक फुलाने किंवा आकाशातल्या नक्षत्रांच्या सड्याने त्याचं उत्तर परस्पर देऊन टाकलं होतं.(पुढे पुढे मात्र हा प्रश्न कधी पडलाच नाही!) कुठल्याही ट्रेकमध्ये मिसळ-पाव खाल्ला नाही आणि एकदा तरी निसर्गाच्या सान्निध्यात "दान" केलं नाही तर ट्रेक निष्फळ ठरतो, तसेच ट्रेकमध्ये नैसर्गिक पाणीसाठे सोडून इतरत्र आंघोळ करणे हे पाप असते या विचारांवर निष्ठा ठेऊन राजांच्या जयघोषात कधी तोरणा-राजगड, तर कधी रतनगड-हरिश्चंद्रगड, कधी पन्हाळगड-विशाळगड तर कधी खांडस-भीमाशंकर अशा वाऱ्या केल्या होत्या! (आणि फावल्या वेळात ट्रेकिंगने आम्हाला काय दिलं, किंवा मी ट्रेक का करतो अशा चर्चांमध्येही सहभागी झालो होतो!)

शहरातल्या रंगीबेरंगी दुनियेपेक्षा सह्याद्रीच्या सहवासातली रंगाची दुनिया अधिक मोहक आणि अस्सल आहे हे आपण केव्हाच स्वत:शी कबूल केलं आहे! आणि म्हणूनच एखादा चित्रपट पुन्हा पुन्हा बघावा तसं दर उन्हाळा-पावसाळा-हिवाळयात त्याच ओढीने आजही तेच किल्ले, तेच उतार, तेच बुरूज, तेच दरवाजे, त्याच कातळ-कपारी, त्याच अवघड पायवाटा आपण तुडवत असतो. अर्थात "सर्व प्रकारचे विरोध" (सूज्ञांस अधिक सांगणे नलगे!) मोडून काढून हे करावं लागतं हे खरंच! पण "हे कार्य" व्हावे ही तो श्रींचीच इच्छा!! कदाचित या ट्रेकिंगमुळेच आपण दैनंदिन जीवनातसुद्धा ट्रेकरच्या खाक्यानेच वागतो. कचरा इकडे-तिकडे टाकत

नाही, पाणी जपून वापरतो, खिशात सदैव एक टॉर्च घेऊन फिरतो, कशाशीही काहीही तोंडी लावून खाऊ शकतो, कुठेही adjust करू शकतो, इतर पर्यटनस्थळांच्या ठिकाणी चाललेला थिल्लरपणा पाहून आपलं रक्त खवळतं इ. इ.

"दुर्ग दुर्गट भारी" या नव्या ई-पुस्तकांच्या मालिकेत आम्ही आपल्यासोबत करणार आहोत महाराष्ट्रातल्या परिचित-अपरिचित गडकोटांची ई-यात्रा! आपण नवखे असाल तर मार्गदर्शक म्हणून आम्ही आपल्या सोबत असू आणि अट्टल भटके असाल तर आपल्यासाठी ही जुन्या सदाबहार आठवणींची यात्रा असेल. एका पुस्तिकेत एक-दोन किल्ले, त्यांची ऐतिहासिक, भौगोलिक माहिती, वैशिष्ट्ये, प्रवासाचे तपशील इ सर्व माहितीने परिपूर्ण अशी ही मालिका असेल. दुर्गभ्रमंतीचं एक रेकनर म्हणूया हवंतर!

आपल्यासारख्या अट्टल भटक्यांच्या स्वागताला आडवाटाही सजवून सदैव तयार असणाऱ्या आपल्या लाडक्या सह्याद्रीमधल्या दुर्गभ्रमंतीला - चला, निघूया!

**नचिकेत जोशी**

**(संपादक, दुर्ग दुर्गट भारी)**

दुर्गबहाद्दरांचे स्वागत.

उन्हाळयाच्या कडक तल्खीत गड भ्रमंतीस निघताना, डोक्यावर तळपणारा सूर्य व समोर न संपणारी चढण दिसू लागते. मग गिर्यारोहणाचा बेतच रद्द करावा लागतो. अशावेळी सागरी किल्ले  पाहणे तसे सोयीस्कर असते. सह्याद्रीतील किल्ल्यावर गिर्यारोहणाच्या अनेक वाऱ्या झाल्या असतील परंतु ऐकून सुपरिचित असलेली आणि अत्यंत कमी जणांनी प्रत्यक्ष पाहिलेली जलदुर्गांची जोडगोळी  म्हणजेच किल्ले खांदेरी - उंदेरी. आज आपण या  निसर्गसुंदर किल्ल्यांच्या जोडगोळीचा प्रवास करणार आहोत. आपल्यापैकी कोणी यापुर्वी इथे गेला असाल तर आपले अनुभव कळवा. आणि या पुढे जाणाऱ्यांनीही खुप माहिती जमा करून आणि फोटो काढून पाठवा.

तेवढीच पुढच्या लोकांना मदत.

# <u>खांदेरी किल्ला</u>

**<u>मागोवा इतिहासाचा</u> :**

शिवाजी महाराजांनी आपली राजधानी राजगडावरून रायगडी हलवली, परंतु शिवराज्याला किल्ला जंजिराची मोठी डोकेदुखी होती. जंजिरावरून सिद्दीची पीडा सर्व मराठी  सत्ताधीशांना सतावीत  होती. त्यामुळेच इंग्रज आणि जंजिराच्या सिद्दी जौहर यांना शह देण्यासाठी तसेच कोंकण किनारपट्टीवर देखरेख ठेवण्यासाठी शिवाजी महाराजांनी मुंबईपासून १५ मैलावर असणा-या थळ जवळील खांदेरी बेटावर किल्ला बांधण्याचे इ.स.१६७२ मध्ये ठरविले. त्याप्रमाणे किल्ल्याची तटबंदी बांधण्यास सुरुवात झाल्यावर इंग्रज व सिद्दी अस्वस्थ झाले.



त्यांनी किल्ल्याला वेढा घालण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे शिवरायांनी तात्पुरती माघार घेतली व किल्ला बांधण्याचे काम थांबविले. इ.स १६७९ माय नाईक भंडारी (भाटकर) हे शिवाजी महाराजांच्या आरमारातील सरदार होते. त्यांच्या नेतृत्वाखाली निवडक १५० माणसे घेऊन ऐन पावसाळयात खांदेरी किल्ल्याच्या बांधकामास पुन्हा सुरुवात करण्यात आली. ह्यामुळे

अस्वस्थ झालेल्या इंग्रजांनी किल्ल्याचे बांधकाम थांबविण्याचा प्रयत्न केला, यानंतर थळ ते खांदेरी ही रसदवाट रोखण्यासाठी "हंटर" ही बोट खांदेरीजवळ ठेवली. शिवाय इतर तीन नौका हंटरच्या मदतीस ठेवण्यात आल्या आणि हे बेट आमच्या मालकीचे आहे व त्यावर शिवाजीने किल्ला बांधु नये, त्याचे गंभीर परिणाम होतील असा निरोपही पाठवण्यात आला. पण किल्ल्यावरुन माय नाईक व किनाऱ्यावरील थळच्या खुबलढा किल्ल्यावरुन दौलतखान यांनी इंग्रजांना प्रतिकार करुन किल्ल्याला रसद पुरवठा चालू ठेवला. या कामात महाराजांच्या आरमारात असलेल्या उथळ तळाच्या छोटया होडयांनी महत्वाची भूमिका निभावली. ओहोटीच्या वेळी उथळ पाण्यातून या बोटींच्या हालचाली चालू असताना इंग्रजांच्या खोल तळ असलेल्या बोटी समुद्रात खोल पाण्यात अडकून पडल्यामुळे इंग्रजांना हात चोळत बसावे लागले. शेवटी इंग्रजांनी इ.स १६८० मध्ये शिवाजी महाराजाचे प्रभुत्व मान्य केले आणि चौलचा मराठी सुभेदार अण्णाजी याजबरोबर तहनाम्यावर सह्या केल्या.

इ.स.१७०१ रोजी सिद्दी याकूत खानने खांदेरी वर हल्ला केला, पण मराठयांनी तो परतवून लावला. इ.स.१७१८ मध्ये इंग्रजांनी मोठा तोफखाना युध्द नौकांवर ठेवून किल्ल्यावर हल्ला केला, पण किल्लेदार माणकोजी सूर्यवंशी याने किल्ला ५०० माणसांनीशी महिनाभर लढवला. त्यामुळे इंग्रजांना हात हलवीत परत जावे लागले. इ.स.१७५५ च्या तहात जरी इंग्रजांना खांदेरीचा ताबा दिला, तरी तो कागदोपत्रीच राहिला. प्रत्यक्ष ताबा इ.स. १७७५ च्या सुरतेच्या तहानंतर मिळाला. इ.स.१७८७ च्या पुरंदर तहानुसार हा राघोजी आग्र्यांनी मराठ्यांच्या नियंत्रणाखाली आणला. पुढे इ.स.१८१४ मध्ये खांदेरी दुसऱ्या बाजीराव पेशव्यांच्या ताब्यात गेला.इ.स.१८१७ मध्ये त्याचा ताबा परत आंग्रेकडे पैशांच्या मोबदल्यात गेला. इ.स.१८१८ मध्ये 'खांदेरी' किल्ला इंग्रजांच्या ताब्यात गेला.



## किल्ल्याचा फेरफटका:



खांदेरी किल्ल्याकडे होडीने जात असतांनाच खांदेरीची मजबूत तटबंदी, बुलंद बुरुज आणि त्यावर असणारे 'मुंबई पोर्ट ट्रस्ट' चे दिपगृह आपले लक्ष वेधून घेते. खांदेरीवर बोटींसाठी धक्का बांधलेला आहे. या धक्क्यावर ज्या ठिकाणी समुदाच्या पाण्याचा स्पर्श होतो तेथे चक्क एक तोफ पुरलेली आहे. या तोफेचा मागचा भाग पाण्यातून डोकावतांना दिसतो. बाजूलाच बोटीची एक शेड बांधली आहे.



### १ वेताळाचे मंदिर :-



धक्क्याच्या बाजुलाच उजवीकडे वेताळाचे लाकडी मंदिर आहे. आत एक मोठी केशरी रंगाने रंगविलेली त्रिकोणी वेडीवाकडी शिळा आहे. ही शिळा म्हणजेच वेताळ होय. ही शिळा दरवर्षी आकाराने मोठी होत जाते, अशी श्रध्दा आहे. येथील स्थानिक कोळी लोकांचे हे कुलदैवत आहे. कोणीही नवी होडी, गलबत घेतलं की नवस फेडण्यास ते वेताळाच्या दर्शनास येतात व बकरा बळी देतात. होळीच्या दिवशी येथे मोठी जत्रा भरते.

### २ लोखंडाचा आवाज येणारा खडक :-

धक्क्यावरून उतरून डावीकडे आपण दिपगृहाकडे निघालो की बाजुलाच झाडांमध्ये मध्यम आकाराचा खडक दिसतो. छोट्या दगडांनी यावर ठोकुन पाहिले असता अक्षरक्ष: लोखंड वाजल्यासारखा आवाज येतो.



### ३ गाड्यावरील असणा-या तोफा :-



धक्क्यावरून दिपगृहाकडे जातांना दिपगृहाला लागूनच दोन तळीं आहेत. ती मागे टाकून दिपगृहाच्या बाजुलाच पुढे बुरुजावर जाण्यासाठी पाय-या केलेल्या आहेत. वर पोहोचल्यावर आपल्याला दिसतात अत्यंत दुर्मिळ अशा गाडयांवर ठेवलेल्या तोफा. ह्या तोफा आकाराने मध्यम असून त्या आजही सुस्थितीत आहे. अजूनही तोफा बाजूला असणा-या लहान टेकडीच्या बुरुजावर आहेत.





**४ दिपगृह :-**

इ.स.१८६७ मध्ये पोर्तुगीजांनी बांधलेले दिपगृह २५ मी.उंचीचे असून षट्कोनी आकाराचे



आहे.दिपगृह अजूनही वापरत आहे. या दिपगृहातून दर १० सेकंदाने प्रकाशझोत टाकला जातो. दिपगृहाच्या अर्ध्या उंचीवर दोन्ही बाजूला एक गच्ची आहे. दिपगृहाच्या शिखरावरून किल्ल्याचा मनोरम देखावा आपण पाहू शकतो. शकतो

**५ मजबूत तटबंदी :-**



दिपगृहाच्या बाजूला तटबंदीवर जिथे हेलिपॅड आहे, तिथेच खाली एक दरवाजा आहे. हा दरवाजा आपल्याला किल्ल्याच्या बाहेरील समुद्राकडे घेऊन जातो. येथून बाहेर पडल्यावर कडेकडेने चालतांना किल्ल्याच्या मजबूत तटबंदीची आणि बुरुजांची कल्पना येते.

याशिवाय किल्ल्यावर महादेवाचे एक जुने मंदिर असून गणपती, मारुती, बौध्द मंदिर, ख्रीस्तांसाठी क्रूस अलिकडे बांधलेली आहेत. वेताळाच्या मंदिराच्या दिशेने चालत गेल्यावर तटबंदीध्ये खाली एक द्वार आहे. तिथेच एक छोटी खोली आहे.

# उंदेरी किल्ला

**मागोवा इतिहासाचा** :

खांदेरी  जलदुर्गामुळे इंग्रज आणि सिद्दी ह्यांच्या समुद्रातील हालचालींवर लक्ष ठेवणे सोपे झाले. त्यामुळे इंग्रज आणि सिद्दी अस्वस्थ झाले. खांदेरी किल्ल्यावर हल्ला करण्यासाठी आणि मराठ्यांच्या हालचालींना चाप लावण्यासाठी सिद्दीने इ.स. १६८० मध्ये खांदेरी पासून जवळच असलेल्या उंदेरी बेटाचा ताबा घेऊन किल्ला बांधण्यास सुरवात केली. मराठ्यांनी सिद्दीचा हा बेत तडीस जाऊ नये म्हणून खूप हल्ले केले. हा किल्ला खांदेरी आणि थळ ह्यांच्या दरम्यान असल्यामुळे सिद्दी आणि मराठे यांच्यात कायम चकमकी होत राहिल्या. पण मराठ्यांना यश आले नाही. इ.स. १६८१ संभाजीराजांच्या काळात महाडच्या दादाजी रघुनाथ प्रभू देशपांडे यांनी उंदेरीवर हल्ला करण्यात केला, दादाजी देशपांड्यांचा पराभव तर झालाच, पण सिद्दीच्या सैन्यांनी महाडपर्यंत पाठलाग करून घरदार लुटले आणि त्यांची बायकामाणसेही पळवली. पुढे चौलचा बजाजी पिलाजी तबीब याने संभाजी राजांना उंदेरी घेऊन द्यायचे कबुल केले. माय नाईक भंडारीच्या मदतीने उंदेरीच्या तटास बोटीदेखील लावल्या. पण सिद्दीला आधी सुगावा लागल्यामुळे खुप मराठे मारले गेले. त्यात खांदेरी किल्ला बांधणाऱ्या माय भंडारीचा मुलगा ठार झाला. काही काळानंतर संभाजीराजांनी सिद्दीचा कायमचा काटा काढण्यासाठी उंदेरीवर निर्णायक हल्ला केला. सिद्दीचे ह्यात खुप नुकसान झाले पण त्यांना किल्ला जिंकता आला नाही. इ.स. १७६० मध्ये नारो त्रिंबकानी उंदेरी किल्ला जिंकून घेतला व त्याचे नाव ठेवले जयदुर्ग. इ.स.  १८१८ पर्यंत किल्ल्याचा ताबा मराठ्यांकडेच होता. त्यानंतर इतर किल्ल्यांप्रमाणे तो इंग्रजांकडे गेला. इ.स.  १८२४ मध्ये त्यांनी उंदेरी किल्ला आंग्रेना दिला. इ.स.  १८४० मध्ये आंग्रे संस्थान खालसा केल्यावर पुन्हा किल्ला इंग्रजांकडे गेला.

मे २००६ मध्ये महाराष्ट्र सरकारने उंदेरी किल्ला “मे. डॉल्फिन स्टोनक्रेस्ट इस्टेट प्रायव्हेट लिमिटेड” या कंपनीला विकला. पण शिवप्रेमींनी केलेल्या जन आंदोलनामुळे हा विक्री करार

रद्द करण्यात आला व उंदेरी किल्ला ही ऐतिहासिक वास्तु असल्याचे शासनाला जाहीर करावे लागले.



## किल्ल्याचा फेरफटका:

उंदेरी किल्ला, खांदेरी किल्ल्यापेक्षा खूप छोटा असल्यामुळे या बेटावर फक्त तटबंदी उभी असल्याचे दिसते. आता ह्या तटबंदीचा बराचसा भाग ढासळला आहे. उंदेरी किल्ल्यावर बोट लावण्यासाठी धक्का नाही. त्यामुळे उंदेरी किल्ल्यावर उतरण्याकरिता पूर्ण ओहोटी असताना तटाला भिडून बोट लावावी लागते. बोटीतून उंदेरीच्या खडकावर उतरल्यावर आपण प्रवेशद्वारापाशी येतो. प्रवेशद्वाराची कमान शाबूत असून धक्क्याच्या जवळच एक छोटस कोरीव लेण आहे. डाव्या बाजूने चालत गेल्यावर पाण्याचे तीन  तळीं  आहेत. त्यापैकी तिसरे तळे हे इतर तळयांपेक्षा मोठे असून त्यात उतरण्यासाठी कमान व पायऱ्या आहेत. पुढे राजवाड्याचे अवशेष आहेत. राजवाड्याच्या पुढे तुळशीवृंदावन आहे. त्याच्या जवळील बुरुजावर ३ तोफा आहेत. किल्ल्याच्या दक्षिणेकडील बुरूजावर २ तोफा व तटबंदीवर ४ तोफा आहेत. उंदेरी किल्ल्यावर एकूण १५-१६ तोफा आहेत. दक्षिणेकडील दुसऱ्या बुरुजात चोर दरवाजा आहे, किल्ल्याच्या पश्चिमेची तटबंदी ढासळलेली आहे. तेथून खांदेरी किल्ल्याचे दर्शन होते. पश्चिम तटावरील बुरुजात एक दरवाजा आहे. गडाच्या उत्तरेकडे दोन बुरुज आहेत, त्यापैकी एकावर २ व दुसऱ्यावर ४ तोफा आहेत. उंदेरी किल्ल्याच्या चार कोपऱ्यावर ४ भक्कम बुरुज आहेत व पूर्व-पश्चिमेला प्रत्येकी ४ असे एकूण १२ बुरुज आहेत. ह्या बुरुजांच्या मध्यभागी चौकोनी / गोलाकार खोलगट जागा ठेवलेल्या आहेत.



**जाण्याचा मार्ग:**

अलिबाग ते रेवस या मार्गावर अलिबागपासून ४ किमी अंतरावर "थळ" नावाच्या गावाचा फाटा लागतो. या फाट्यापासून २ ते ३ किमी वर "थळ" गाव आहे. अलिबागहून येण्यासाठी एसटी बस उपलब्ध आहेत.अलिबागहून थळकडे जाणा-या एसटी ने ही आपण बाजारपेठेकडे जाणा-या फाट्यावर उतरून चालत येथ पर्यंत येऊ शकतो. थळ बाजारपेठे जवळून आपल्याला किल्ल्यावर जाण्यास बोटी मिळू शकतात. थळ बाजारपेठे जवळच्या समुद्रकिना-याहून दिसणारी दोन बेटे आपले लक्ष सहज वेधून घेतात. यापैंकी जवळ असणारा किल्ला म्हणजे उंदेरी व डाव्याबाजूला थोड्या लांब असणारा किल्ला म्हणजे खांदेरी होय. खांदेरी किल्ला त्यावर असणा-या दिपगृहामुळे लगेच लक्षात येतो. थळ बाजारपेठेच्या ठिकाणी सकाळी लवकर येणे सोईस्कर अन्यथा किना-यावरील बोटी मासेमारी करण्यासाठी सकाळी ६ , ६.३० च्या आत समुद्रात जायला निघतात. उशीरा पोहोचल्यास मासेमारी करून येणाया बोटी आपल्याला मिळू शकतात. मध्यम आकाराच्या साधारणत: ५ ते ६ लोक बसू शकतील अशा होडया खांदेरी -



उंदेरी दाखवून परत आणण्याचे होडीवाले भाव सांगतांना मात्र दुप्पट सांगतात. खांदेरी किल्ल्यावर ज्याप्रमाणे बोटींना धक्क्याची सोय आहे, ती सोय उंदेरीवर नाही. त्यामुळे उंदेरीवर ओहोटीच्या वेळेसच जाता येते.खांदेरीवर कधीही गेले तरी चालते, मात्र उंदरीवर भरती ओहोटीची वेळ पाहूनच जावे लागते.

थळच्या समुद्रकिना-याहून उंदेरी किल्ला समुद्रात साधारण अडीच किमी वर आहे, तर उंदेरीहून पश्चिमेला पाऊण किमी वर खांदेरी आहे. अन थळच्या किनाऱ्यावर खुबलढा हा सारं काही गमावून बसलेला अती चिमुकला किनारी किल्ला त्यांना साथ देतो आहे. आतली सपाटी नीटनेटकी करून सारवून घेतली आहे. मासे वाळवण्यासाठी त्याचा उपयोग होतो.



पुर्वी खांदेरी- उंदेरी किल्ले मुंबई पोर्ट ट्रस्टच्या ताब्यात होते. त्यामुळे जाण्यासाठी डेप्युटी कॉन्झर्व्हेटर ,मुंबई पोर्ट ट्रस्ट, हेड ऑफिस बिल्डींग, शुरजी वल्लभदास मार्ग, मुंबई ४०००३८ यांचेकडून लेखी परवानगी लागत असे. पण आता तो केंद्र सरकारच्या शिपिंग व लाईट हाऊस विभागाच्या आधीन आहे. महाराष्ट्र पर्यटन महामंडळाच्या महाभ्रमण योजनेखाली जिद्द ग्रुप तर्फे खांदेरी-उंदेरी वर जाणे शक्य झाले आहे. जिद्द ग्रुपचे श्री. सुनील राज (९८६९३३१६१७) कित्येक वर्ष पावसाळयाचे दिवस सोडून ही मोहीम यशस्वीरित्या राबवत आहे.

**राहाण्याची सोय :**

किल्ल्यावर राहण्याची सोय नाही.



**जेवणाची सोय :**

जेवणाची सोय आपण स्वत: करावी.

**पाण्याची सोय :**

खांदेरीवर पिण्याचे पाण्याचे टाके आहे. तेथून पाणी पंप करून दिपगृहापर्यंत नळाने नेले आहे.

उंदेरीवर पाणी अजिबात नाही.

**जाण्यासाठी लागणारा वेळ :**

अलिबाग मार्गे २ तास लागतात.

# आवाहन

दोस्त !

गेले वर्षभर ई साहित्य प्रतिष्ठानतर्फ़े आम्ही दुर्ग दुर्गट भारी या मालिके द्वारे किल्ल्यांची माहिती जमा करत आणि वितरित करीत आहोत. माधुरी आणि अरविंद नाईक हे आमचे वाचक. त्यांना भटकण्याची आवड होती. आम्ही त्यांना त्यांचे अनुभव लिहायचा आग्रह केला आणि त्यातून ही पुस्तिका तयार झाली.

किल्ल्यांची माहिती इंटरनेटवर देण्याचा हा उपक्रम कसा वाटला ते आम्हाला जरूर कळवा. तसेच आपल्या ट्रेकसाठी या महितीचा आपल्याला कसा उपयोग झाला तेही जाणून घ्यायला आम्हाला आवडेल. यात अजून काय आणि कशी सुधारणा करता येईल तेही सांगा. तुम्हाला अशी एखाद्या गडाची ओळख करून द्यायला आवडेल? आपण पाहिलेल्या गोष्टी फ़क्त लिहून द्या. त्यासाठी लेखक वगैरे असण्याची गरज नाही.

या गडाबद्दल किंवा बृहन्महाराष्ट्रातल्या कोणत्याही गड किल्ल्याबाबत आपणाकडे माहिती फ़ोटो असल्यास कृपया आमच्याशी संपर्क साधा. पुस्तिकांची ही मालिका अधिकाधिक समृद्ध होण्यासाठी आपली मदत हवी आहे. तसेच गडकिल्ल्यांशी संबंधित काम करणारा आपला काही ग्रुप वगैरे असल्यास आम्हाला आपली माहिती कळवा. आपला किंवा आपल्या माहितीतल्या कुणाचा ब्लॉग, वेबसाईट यांचीही लिंक पाठवा. निवडक दर्जेदार लेखन आम्ही आपल्या नावासहित प्रसिद्ध करू.

आज इवलिसी दिसणारी ही पुस्तिका कालांतराने एक संदर्भ ग्रंथ बनावी अशी इच्छा आणि योजना आहे. आणि हे आपल्या मदतीशिवाय अशक्य आहे.

आपल्या सर्व प्रकारच्या प्रतिसादांसाठी

लिहा

durgabhari@gmail.com

ई साहित्य प्रतिष्ठानच्या या पुर्वी प्रसिद्ध झालेल्या ई पुस्तकांसाठी

भेट द्या

www.esahity.com